नवीन महाबळेश्वर गिरीस्थानाचे
नियोजन व विकास करण्याबाबत

**महाराष्ट्र शासन**
गृह विभाग (पर्यटन)
शासन निर्णय, क्रमांक एमटीसी २००१/९/प्र.क्र.४७८/पर्यटन,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२, दिनांक २१ ऑगस्ट, २००४.

वाचा:- १) नियोजन विभागाचे पत्र क्र.पासुस २०००/प्र.क्र.६६/का.१४७४, दिनांक १.१२.२००१.
२) शासन निर्णय, क्रमांक एमटीसी २००१/९/प्र.क्र.४७८/पर्यटन, दिनांक १०.२.२००२.

**प्रस्तावना:-**महाबळेश्वर, पांचगणी परिसरात असलेल्या सुविधा अपु-या असूनही दरवर्षी पर्यटकांच्या संख्येत मोठी वाढ होत आहे. केंद्र शासनाने जारी केलेल्या निर्बंधानुसार महाबळेश्वर, पांचगणी येथे विकास कामे यापुढे करता येणे शक्य नाही. मागणी असूनही गेल्या ५० वर्षात महाराष्ट्रात नवीन गिरीस्थानाचा विकास करण्यात आला नाही. अशा परिस्थितीत नवीन महाबळेश्वर विकास प्रकल्प उभारणे ही अत्यावश्यक गरज आहे. हा प्रकल्प पूर्ण झाल्यास महाराष्ट्र राज्यातील आर्थिक विकास, रोजगार निर्मिती,पर्यटन उद्योग वाढीस फार मोठी चालना मिळणार आहे.

२. मा. मुख्यमंत्री यांचे अध्यतेखाली दिनांक २६.९.२००१ रोजी झालेल्या मंत्रिमंडळाच्या पायाभूत सुविधा समिती बैठकीत नवीन महाबळेश्वर विकासाच्या प्रस्तावास तत्वत: मान्यता देण्यात आली. तसेच याबाबतचा सुसाध्यता अहवाल तयार करण्यास महाराष्ट्र राज्य रस्ते विकास महामंडळास प्राधिकृत करण्यात आले होते. महाराष्ट्र राज्य रस्ते विकास महामंडळाने तज्ञ सल्लागारामार्फत सुसाध्यता अहवाल तयार केला असून त्याची प्रमुख वैशिष्टये खालीलप्रमाणे आहेत:-

**प्रमुख वैशिष्टये**

| | | |
|---|---|---|
| १) | प्रकल्पाचे क्षेत्र | ३७२६३ हेक्टर |
| २) | विकसित करावयाची जमीन | ५३०० हेक्टर |
| ३) | खाजगी जमीन संपादन | ३८०० हेक्टर |
| ४) | हस्तांतरित करावयाची शासकीय जमीन | १५०० हेक्टर |
| ५) | भूसंपादनाचा संभाव्य खर्च | रु.५४ कोटी |
| ६) | प्रकल्पाची अंदाजित किंमत | रु.६७८ कोटी |
| ७) | प्रकल्प सुसाध्य होण्याचा अपेक्षित कालावधी | ( सुमारे १५ वर्षे) |

या प्रकल्पात त्या ठिकाणची जमीन विकसित करुन ती वेगवेगळया उद्योजकांना विविध सुविधा विकसित करण्यासाठी लीजवर देण्याचे प्रस्तावित आहे. तसेच या परिसरात पाणीपुरवठा

वीज, रस्ते वगैरे मुलभूत सोयी विकसित करणे या बाबी समाविष्ट आहेत. त्याचप्रमाणे, या प्रदेशात काही सामाजिक, अन्य सोयी विकसित करण्याचे सुध्दा प्रस्तावित आहे.

३. सदर प्रकल्पासाठी सुमारे १५०० हेक्टर शासकीय जमीन उपलब्ध करण्यात येणार असून या कामी महामंडळाने केलेल्या प्राथमिक सर्वेक्षणानुसार सदर प्रकल्पासाठी सातारा जिल्हयातील खालील प्रमाणे सरकारी जमीन उपलब्ध करावयाची आहे.

| अ. क्र. | तालुका | गावांची एकूण संख्या | सरकारी जमीन हेक्टर | शेरा |
|---|---|---|---|---|
| १ | पाटण | २९ | १,४१३ | सदर जमीन ही गायरान/ बरकड/ नापीक/ खडकाळ आहे. |
| २ | सातारा | ८ | ३२ | -"-"- |
| ३ | जावळी | १५ | ५५ | -"-"- |
| | | ५२ गांवे | १,५०० हेक्टर (अंदाज) | -"-"- |

या संदर्भात दिनांक १२.८.२००४ रोजी मंत्रिमंडळाने घेतलेल्या निर्णयाच्या अनुषंगाने खालीलप्रमाणे शासन निर्णय निर्गमित करण्यात येत आहे:-

**शासन निर्णय:-**

१) नवीन महाबळेश्वर विकास प्रकल्पाला तत्वतः मान्यता देण्यात येत आहे.

२) यासाठी महाराष्ट्र पर्यटन विकास महामंडळामार्फत विशेष उद्दिष्ट संस्था स्थापन करण्यास मान्यता देण्यात येत आहे.

३) या प्रकल्पासाठी आवश्यक असलेली कोयना व इतर प्रकल्पातील सुमारे १५०० हेक्टर अतिरिक्त व सुयोग्य सरकारी जमीन, तसेच इतर संपूर्ण जमीन महाराष्ट्र पर्यटन विकास महामंडळ/ विशेष उद्दिष्ट संस्था लिजवर देण्यासही मान्यता देण्यात येत आहे.

४) वरील निर्णयानुसार महाराष्ट्र पर्यटन विकास महामंडळाने याबाबत सुसाध्यता अहवाल तयार करावयाचा आहे.

या संदर्भातील इतर निर्णयाबाबत सुसाध्यता अहवाल प्राप्त झाल्यानंतर आदेश काढण्यात येतील.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

( र. य. नलावडे )
अवर सचिव, गृह विभाग, महाराष्ट्र शासन.

प्रति,
मा.राज्यपाल यांचे सचिव,
मा.मुख्यमंत्री यांचे सचिव, मंत्रालय, मुंबई,
मा.उप मुख्यमंत्री यांचे सचिव, मंत्रालय, मुंबई,

मा.मंत्री (नियोजन) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई,
मा.मंत्री (नगर विकास) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई,
मा.मंत्री ( महसूल) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई,
मा.मंत्री (नियोजन) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई,
मा.मंत्री (पर्यटन) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई,
मा.मंत्री (उद्योग) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई,
मा.मंत्री (उर्जा) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई,
मा.मंत्री (सार्वजनिक बांधकाम) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई,
मा.मंत्री (पर्यावरण) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई,
मा.राज्यमंत्री (पर्यटन) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई,
मुख्य सचिव यांचे स्वीय सहाय्यक, मंत्रालय, मुंबई,
अपर मुख्य सचिव (वित्त), मंत्रालय, मुंबई,
अपर मुख्य सचिव (नियोजन), मंत्रालय, मुंबई,
प्रधान सचिव, महसूल व वन विभाग, (महसूल)/(वने), मंत्रालय, मुंबई,
प्रधान सचिव, नगर विकास विभाग, मंत्रालय, मुंबई,
प्रधान सचिव, उद्योग ऊर्जा व कामगार विभाग, (ऊर्जा), मंत्रालय, मुंबई,
प्रधान सचिव, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग, मंत्रालय, मुंबई,
प्रधान सचिव (पर्यटन) , मंत्रालय, मुंबई.
सचिव, सार्वजनिक बांधकाम विभाग, मंत्रालय, मुंबई,
विभागीय आयुक्त, पुणे,
जिल्हाधिकारी, सातारा ,
सदस्य सचिव, महाराष्ट्र पाणीपुरवठा व जलनिस्सारण मंडळ, मुंबई,
व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र पर्यटन विकास महामंडळ, मुंबई,
व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र राज्य रस्ते विकास महामंडळ,मुंबई,
व्यवस्थापकीय संचालक, माहिती व जनसंपर्क विभाग, मंत्रालय, मुंबई,
कार्यकारी संचालक, महाराष्ट्र राज्य रस्ते विकास महामंडळ,मुंबई,
मुख्य अभियंता, सार्वजनिक बांधकाम विभाग, सातारा,
मुख्य अभियंता, महाराष्ट्र राज्य विद्युत मंडळ, मुंबई,
मुख्य वनसंरक्षक, सातारा,
महालेखापाल-१, मुंबई (लेखा परीक्षा/लेखा व अनुज्ञेयता), मुंबई,
महालेखापाल-२, (लेखा परीक्षा/लेखा व अनुज्ञेयता), नागपूर,
अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई,
निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई,
नियोजन विभाग (का.१४१२) मंत्रालय, मुंबई,
वित्त विभाग (का. व्यय-८/अर्थोपाय), मंत्रालय, मुंबई,
निवड नस्ती, कार्यासन-पर्यटन.